संगणक सांकेतांक क्र ⇒ २०१००८१६१८३५५८००१

राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना
१९८२-वर्गणीच्या दरात वाढ करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. गवियो- १००९ / प्र क्र ५८ / वर्गणी / विमा प्रशासन**
**मंत्रालय, मुंबई :-४०० ०३२.**
**दिनांक ०२ ऑगस्ट, २०१०.**

संदर्भ :१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. डीओआय २०८१/७०१/ एडीएम-५ दिनांक २६/४/१९८२

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. गवियो १०८९/प्र.क्र. ६६४/ ८९ विमा, दिनांक ८/१/१९९०

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. गवियो १०८९/प्र.क्र. ६६/ ८९ विमा, दिनांक १४/२/१९९०

४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. गवियो १०.०२/प्र.क्र. ३०/शाहमी, दिनांक २६जुलै २००२

**प्रस्तावना :**

राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना १मे १९८२ पासून लागू करण्यात आल्यानंतर गट विमा योजनेच्या वर्गणीचे/ विमा संरक्षणाचे दर १ जानेवारी १९९० पासून सुधारित करण्यात आले. पाचव्या वेतन ,आयोगाच्या शिफारशीनुसार वेतनश्रेणी लागू करण्यात आल्यानंतर दिनांक १ जानेवारी २००२ पासून वर्गणीच्या दरात सुधारणा करण्यात आली होती. आता सहाव्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेणी दिनांक १/१/२००६ पासून लागू करण्यात आल्या आहेत त्या अनुषंगाने आणि विविध कर्मचारी संघटनांशी चर्चा करुन व त्यांनी केलेल्या सूचना विचारात घेऊन शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्यां मासिक वर्गणीचे दर व त्यानुरुप मिळणारे लाभ यामध्ये दिनांक १ जानेवारी २०१० पासून पुढील प्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सध्या अस्तित्वात असलेल्या दरांऐवजी खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे गट विमा योजनेची सुधारित वर्गणी राज्य शासकीय कर्मचा-यांच्या जानेवारी २०१० पासूनच्या वेतनातून वसूल करण्याचे आदेश देण्यात येत आहेत.

| स्तंभ-१ | स्तंभ-२ | स्तंभ-३ | स्तंभ-४ |
|---|---|---|---|
| वर्ग | दि. १ जानेवारी २०१० रोजी नियमीत शासकीय सेवेत असलेल्या कर्मचा-यांच्या मासिक वेतनातून वसूल करावयाची वर्गणी (रुपये) | दि. २ जानेवारी २०१० ते ३१ डिसेंबर २०१० पर्यंत नियमीत शासकीय सेवेत दाखल झालेल्या कर्मचा-यांच्या मासिक वेतनातून वसूल करावयाचा केवळ विमा संरक्षणाचा हप्ता. (रुपये) | शासकीय सेवेत असताना कर्म - चाऱ्यांला मृत्यु आल्यास, कुटुंबियांना देय होणारी विम्याची रक्कम. (रुपये) |
| गट-अ | ९६०/- (नऊशे साठ) | ३२०/- ( तीनशे वीस) | ९,६०,०००/- (नऊ लाख साठ हजार) |
| गट-ब | ४८०/- (चारशे ऐंशी) | १६०/- (एकशे साठ) | ४,८०,०००/- (चार लाख ऐंशी हजार) |
| गट-क | १२०/- (एकशे वीस) | ४०/- (चाळीस) | १,२०,०००/- (एक लाख वीस हजार) |
| गट-ड | ६०/- (साठ) | २०/- (वीस) | ६०,०००/- (साठ हजार) |

२. वरीलप्रमाणे सुधारित दर १ जानेवारी २०१० पासून लागू होतील. सुधारित दराने मासिक वर्गणीची वसूली १ सप्टेंबर २०१० रोजी देय होणा-या माहे ऑगस्ट २०१० च्या वेतनातून करण्यात येईल. जानेवारी २०१० ते जुलै २०१० या कालावधीतील सुधारित वर्गणीच्या फरकाची रक्कम बिनव्याजी समान हप्त्यात १ सप्टेंबर २०१० ते ३१ मार्च, २०११ या कालावधीच्या वेतनातून वसूल करण्यात यावी.

३. कालबध्द पदोन्नती योजनेअंतर्गत किंवा सेवा अंतर्गत आश्वासीत प्रगती योजनेअंतर्गत वरिष्ठ वेतनश्रेणी दिलेल्या अधिकारी/ कर्मचा-यांच्या बाबतीत वरिष्ठ वेतनश्रेणीच्या अनुषंगाने त्यांच्या मुळ पदाचा विचार न करता विमा वर्गणी वसूल करण्यात यावी. तसेच वरिष्ठ वर्गातील वेतनश्रेणीचे पद कनिष्ठ गटात अंतर्भूत झाल्यास मासिक वर्गणीचा दर पूर्वीच्याच वरिष्ठ वर्गातील वेतनश्रेणीप्रमाणे ठेवण्यात यावा व त्या दराप्रमाणेच त्या कर्मचा-यांना विमा निधीची रक्कम देण्यात यावी.

४. सुधारित दराने वर्गणी वसुली माहे ऑगस्ट, २०१० पासून लागू असल्याने जर एखादा अधिकारी/ कर्मचारी माहे ऑगस्ट, २०१० किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झाला किंवा शासकीय सेवेत असताना त्याचे निधन झाले, तर यथास्थिती त्याला किंवा त्याच्या वारसाला सुधारित दराचा लाभ देण्यापूर्वी थकबाकीची रक्कम लाभ प्रदानातून एकरकमी वळती करुन घेण्यात येईल.

५. दिनांक ३१ जुलै,२०१० अखेरपर्यंत जे अधिकारी/ कर्मचारी सेवानिवृत्त झाले किंवा त्यांचे निधन झाले असेल त्यांना गट विमा योजनेअंतर्गत असुधारित दराने( पूर्वीच्या दराने) बचत निधी / विमानिधीचे लाभ प्रदान करण्यात यावे अशा प्रकरणांमध्ये मासिक वर्गणीच्या फरकाची रक्कम वसूल करण्यात येऊ नये.

६. गट विमा योजनेचे सभासदत्व यापूर्वीच प्राप्त झालेल्या तसेच दिनांक १ जानेवारी, २०१० रोजी किंवा तत्पूर्वी शासकीय सेवेत " नियमितरित्या " स्थानापन्न असलेल्या परिच्छेद क्रमांकः- ५ मधील कर्मचारी वगळून इतर सर्व कर्मचा-यांच्या वेतनश्रेणीच्या गटानुसार सुधारित दराने वर्गणी संबंधिताकडून जानेवारी २०१० पासून बिनव्याजी वसूल करण्यात यावी.

७. दिनांक २ जानेवारी २००९ ते ३१ डिसेंबर २००९ पर्यंतच्या कालावधीत नियमितरित्या नियुक्त झालेल्या /पदोन्नत झालेल्या कर्मचा-यांना दिनांक १ जानेवारी २०१० पासून गट विमा योजनेचे सभासद करुन घ्यावे व त्यांच्या वर्गवारीनुसार सुधारित दराने वर्गणी वसूल करण्यात यावी.

८. दिनांक २ जानेवारी २०१० ते ३१ डिसेंबर २०१० या कालावधीत शासकीय सेवेत नियमित नियुक्त होणा-या कर्मचा-यांकडून परिच्छेद- १ मधील तक्त्याप्रमाणे स्तंभ - ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे केवळ विमा संरक्षणाच्या हप्त्याची वसूली करण्यात यावी. गट विमा योजनेच्या पुढील वर्धापन दिनास म्हणजेच दिनांक १ जानेवारी २०११ रोजी त्यांना गट विमा योजनेचे नियमित सभासद करुन घेवून बचत निधी व विमा निधी संरक्षणाच्या हप्त्याची रक्कम मिळून पूर्ण दराने वरील परिच्छेद- १ मधील तक्त्यातील स्तंभ - २ प्रमाणे वर्गणी वसूल करण्यात यावी.

९. गट विमा योजनेच्या वर्गणीचे दर बदलल्यामुळे बचत निधीच्या लाभ प्रदानाच्या परिगणीतीय तक्त्यामध्ये देखील बदल होणार आहे. तथापि सुधारित तक्ते निर्गमित करण्यासाठी काही कालावधी लागणार असल्याने सुधारित तक्ते प्रसारित होईपर्यंत मृत्यू, सेवानिवृत्ती, राजीनामा इ. कारणामुळे ज्यांचे सभासदत्व दि. १ जानेवारी,२०१० पासून पुढे संपुष्टात येणार आहे त्यांना बचत निधीतील संचित रकमेचे प्रदान तूर्त शासन निर्णय क्रमांकः गवियो-१०.१०/ प्र.क्र. ८/२०१० / विमा प्रशासन, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१० अन्वये प्रसारित केलेल्या परिगणीतीय तक्त्यानुसार करण्यात यावे व सुधारित तक्ते प्रसारित झाल्यावर सुधारित तक्त्यानुसार त्यांना देय होणारी बचत निधीची रक्कम प्रदान तसेच अतिरिक्त रक्कम वसूल करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

१० गट विमा वर्गणीच्या सुधारित दरांमुळे विमा निधीच्या संचित रकमेत तुट / आवश्यकतेपेक्षा अधिक अधिक्य येत असल्याचे आढळून आल्यास पुढील वर्षामध्ये बचत निधीच्या व्याज दरात / प्रमाणात आवश्यक तो फेरबदल करण्यात येईल.

११ गट विमा योजनेच्या वर नमूद केलेल्या वाढीव दराने वर्गणी वसूल करण्याच्या संदर्भात राज्य शासकीय कर्मचारी गट विमा योजना १९८२ च्या नियमात आवश्यक त्या दुरुस्त्या यथावकाश स्वतंत्रपणे करण्यात येतील.

१२ सर्व विभाग प्रमुखांनी सदर आदेश त्यांच्या नियंत्रणाखाली कार्यालय प्रमुख व इतर कार्यालये यांच्या निदर्शनास आणावेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

(स. अ. मु. नकवी)
**वि. का. अ. तथा उप सचिव**

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
सर्व संसद सदस्य महाराष्ट्र राज्य
बहुजन समाज पार्टी १, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई - १.
भारतीय जनता पार्टी महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ. बॅरिक नं. १, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट,मुंबई
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन,एस. व्हि. पटेल रोड, मुंबई
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबइ-२५
नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई -२१
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य वित्त व लेखा अधिकारी
मंत्रालयाच्या सर्व विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र, नागपूर
प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-२ - महाराष्ट्र,नागपूर
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरीक्षा),महाराष्ट्र ,मुंबई
सचिव महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
प्रबंधक, , उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा,कोकण भवन,नवी मुंबई
सह मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ट) स्थानिक निधी लेखा मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सह संचालक, ले. व को. पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
संचालक,नगर पालिका प्रशासन, मुंबई
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व उपकोषागार अधिकारी
सर्व कृषी विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य
निवड नस्ती, विमा प्रशासन कार्यासन, वित्त विभाग

---------